**नाजकधा कलम २० अन्वये मंजूर करण्यात आलेल्या योजनेखालील क्षेत्रावरील बांधकाम अयोग्य आरक्षणासाठी संबंधित जमिनधारकास हस्तांतरण विकास हक्क मंजूर करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नाजक-२०१५/प्र.क्र.१२३/नाजकधा-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : ०१ डिसेंबर, २०१५.

**वाचा :**

1) **शासन निर्णय गृह निर्माण व सामाजिक सहाय्यता विभाग क्रमांकः एसएसएस-१०८६/२३४०/XIII, दि. २२.८.१९८६**
2) **शासन आदेश क्रमांकः डीसीआर-१०९५/प्र.क्र.४५/नवि-११, दि. २३.२.२०००**

**प्रस्तावना :-**

नागरी जमीन (कमाल धारणा व विनियम) अधिनियम, १९७६ मधील कलम २० अनुसार मंजूर करण्यात आलेल्या योजनेच्या आदेशामध्ये नमूद करण्यात आलेल्या अटी व शर्ती गृहनिर्माण व सामाजिक सहायता विभाग, शासन निर्णय क्र. एस.एस.एस १०८६/ २३४०/XIII, दि.२२.८.१९८६ नुसार निश्चित करण्यात आलेल्या आहेत.

ना.ज.क.धा. कलम २० खालील सुटीच्या आदेशामधील अटीनुसार योजनेखालील क्षेत्रावर संबधित नियोजन प्राधिकरणाकडून त्यांचे विकास नियंत्रण नियमावलीनुसार आरक्षणे ठेवली असतील तर अशा आरक्षणाखालील क्षेत्र संबंधित विकास प्राधिकरणास विनामुल्य हस्तांतर करण्यात येईल असे नमूद करण्यात आले आहे. परंतु विकास योजनेनुसार बांधकाम अयोग्य आरक्षणे, ना.ज.क.धा अधिनियमाच्या कलम २(क्यू)(१) अन्वये बिनमोकळी ठरत असल्याने अशा जमिनींना ना.ज.क.धा. अधिनियमातील तरतुदी लागू होत नसल्याने शासन आदेश क्र. डी.सी.आर. १०९५/प्र.क्र. ४५/नवि-११, दि.२३ फेब्रुवारी, २००० नुसार बृहन्मुंबई नागरी समुहासाठी बांधकाम अयोग्य आरक्षणाखालील क्षेत्रासाठी हस्तांतरण विकास हक्क मंजूर करण्यात आला आहे. मुंबई नागरी समुहासाठी घेण्यात आलेला धोरणात्मक निर्णय राज्यातील उर्वरित ८ नागरी समुहासाठी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील नऊ नागरी समुहामध्ये नागरी जमीन (कमाल धारणा व विनियम) अधिनियम, १९७६ मधील कलम २० अन्वये सुट देण्यात आलेल्या एकूण क्षेत्रापैकी अंशत: / संपुर्ण क्षेत्रावर संबधीत नियोजन प्राधिकरणाने विकास नियंत्रण नियमावलीनुसार बांधकाम अयोग्य आरक्षणे दर्शविण्यात आली असतील तर अशा आरक्षणाखालील क्षेत्र ना.ज.क.धा. अधिनियम, १९७६ च्या कलम २(क्यू)(१) नुसार बिनमोकळे ठरत असल्याने त्यास ना.ज.क.धा. अधिनियमाच्या तरतुदी लागू होत नाहीत.

आता राज्यातील नागरी समुहामधील जमिनीबाबत विकास योजनेनुसार ना.ज.क.धा. अधिनियम, १९७६ च्या कलम २० खालील योजनेच्या क्षेत्रावर “बांधकाम अयोग्य” आरक्षण दर्शविण्यात आले असेल तर त्या क्षेत्रासाठी गृहनिर्माण व सामाजिक सहायता विभाग, शासन निर्णय क्र.एस.एस.एस १०८६/२३४०/XIII, दि.२२.८.१९८६ अन्वये आरक्षणाखालील जमीन विनामोबदला नियोजन प्राधिकरणास हस्तांतरीत करणेत यावी अशी कलम २० च्या आदेशामध्ये नमूद केलेली अट ना.ज.क.धा. अधिनियम, १९७६ ची सुसंगत नाही. त्यामुळे शासनाने शासन निर्णय क्र.डी.सी.आर. १०९५ /प्र.क्र. ४५/नवि-११, दि.२३.२.२००० नुसार मुंबई नागरी समुहाकरिता ना.ज.क.धा. अधिनियम, १९७६ च्या कलम २० च्या योजनेखालील बांधकाम अयोग्य क्षेत्राकरिता फक्त हस्तांतरण विकास हक्क (TDR) देण्याबाबत घेतलेल्या निर्णयानुसार राज्यातील उर्वरित नागरी समुहातसुध्दा जमीनधारकाच्या कलम २० खालील योजनेच्या एकूण क्षेत्रापैकी ज्या क्षेत्रावर बांधकाम अयोग्य आरक्षण दर्शविण्यात आले असेल त्या क्षेत्राचा “हस्तांतरण विकास हक्क” (TDR) संबधीत जमिनधारकास देय होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१६१४१९१०११२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shriram Dattatraya Yadav

Digitally signed by Shriram Dattatraya Yadav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50cb0ce4cc4fe54c74f42b860354e86ec00b3b36f5f215c9f7658e611006a200, cn=Shriram Dattatraya Yadav
Date: 2015.12.01 12:34:45 +05'30'

**( श्री. द. यादव )**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, महानगरपालिका, बृन्हमुंबई, पुणे, नाशिक, नागपूर, सोलापूर, सांगली-मिरज-कुपवाड, ठाणे, कल्याण-डोंबिवली व कोल्हापूर.
८. अप्पर जिल्हाधिकारी व सक्षम प्राधिकारी, बृन्हमुंबई, पुणे, नाशिक, नागपूर व ठाणे.
९. उप जिल्हाधिकारी व सक्षम प्राधिकारी, सोलापूर, सांगली, उल्हासनगर व कोल्हापूर.
१०. सह सचिव (नवि-११), मंत्रालय, मुंबई.
११. कक्ष अधिकारी, ना.ज.क.धा. १ व २, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती, ना.ज.क.धा.-३.